महानगरपालिकांच्या कार्यक्षेत्रातील रस्त्यांवरील बेकायदेशीरपणे सोडून दिलेली वाहने/ बेवारस वाहनांसंदर्भात कारवाईबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.३५/नवि-२०

मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०२ मार्च, २०२०

**संदर्भ**:-(१) नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.६७९/नवि-२०, दिनांक १४.०९.२०१८.

(२) गृह विभाग, शासन परिपत्रक क्र.न्यायाप्र-०८१८/प्र.क्र.१०५/पोल-८, दिनांक ०९.१०.२०१८.

**प्रस्तावना: -**

महानगरपालिकेच्या हद्दीतील रस्ते, पुल, उड्डाणपुल येथे अनधिकृतपणे सोडून दिलेल्या बेवारस वाहनांमुळे रहदारीस मोठ्या प्रमाणात अडथळा निर्माण होतो तसेच, कार्यक्षेत्रातील स्वच्छता, सुरक्षितता व अपघात शक्यता यासारखे प्रश्न निर्माण होण्याची शक्यता मोठ्या प्रमाणात वाढते. महानगरपालिका अधिनियमातील तरतूदींन्वये संबंधित महानगरपालिका अशा प्रकरणी कारवाई करतात. संदर्भिय परिपत्रकांन्वये अशा प्रकरणी करावयाच्या कारवाईबाबत मार्गदर्शक सूचना देखील देण्यात आल्या आहेत.

तथापि, बहुसंख्य महानगरपालिका क्षेत्रात बेवारस वाहनांमुळे रहदारीस मोठ्या प्रमाणात अडथळा निर्माण होऊन, अनेक प्रश्न निर्माण होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आल्याने, अशा वाहनांवर ठोस व कालमर्यादेत कारवाई करण्यासाठी विशेष मोहिम व कारवाई करण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक: -**

महानगरपालिका कार्यक्षेत्रात अनधिकृतपणे सोडून दिलेल्या बेवारस वाहनांवर कारवाईसाठी संदर्भ क्र.२ अन्वये महाराष्ट्र पोलीस कायदा, १९५१ कलम ८२, महाराष्ट्र मोटर वाहन नियम, १९८९ नियम २२२ व मोटर वाहन कायदा, १९८८ कलम १२२ च्या अनुषंगाने विहीत करण्यात आलेल्या

कार्यपध्दतीनुसार महानगरपालिकांनी, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, कलम २३०,२३१ व २४३ अन्वये तसेच बृहन्मुंबई महानगरपालिकेने मुंबई महानगरपालिका अधिनियमांच्या विहित तरतूदी अन्वये कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात येत आहे.

०२. उक्त अधिनियमांतील तरतूदीनुसार कारवाईत संबंधित पोलीस कार्यालय व परिवहन विभाग यांच्याशी समन्वय ठेवून, महानगरपालिकांनी सहभागी व्हावे. संदर्भ क्र.१ अन्वये दिलेल्या सुचनांनुसार कारवाईचे नियोजन करावे.

०३. महानगरपालिका क्षेत्रातील बेवारस वाहनांसंदर्भात कारवाईसाठी आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एका महिन्यांच्या कालावधीसाठी विशेष मोहिम सुरू करावी.

०४. सदर विशेष मोहिमेतंर्गत कारवाईचे संनियत्रण संबंधित महानगरपालिका आयुक्तांनी करावे. या विशेष मोहिमेसाठी १ उपायुक्त दर्जाचा अधिकारी पद निर्देशित करावा.

०५. सदर विशेष मोहिम १ महिन्यांच्या कालावधीसाठी असेल. सदर मोहिम खाली विहीत केलेल्या कालावधी (कालमर्यादा) नुसार कार्यान्वीत केली जावी: -

(अ) मोहिमेतील पहिल्या ३ दिवसात रस्त्यावर अनधिकृतपणे लावलेल्या बेवारस वाहनांचे प्रभाग निहाय सर्वेक्षण करण्यात यावे.

(ब) मोहिमेच्या चौथ्या व पाचव्या दिवशी संबंधित वाहनांवर सदर वाहन हलवण्यासाठी ७ दिवसांचा कालावधी दिलेली नोटीस लावण्यात यावी व त्याचे छायाचित्र काढण्यात यावे. ७ दिवसांपेक्षा कमी कालावधीची नोटीस देण्याची संबंधित महानगरपालिकेस मुभा राहील.

(क) या नोटीस कालावधीत जी वाहने हटविली जाणार नाहीत, अशी वाहने इतरत्र लावण्यासाठी सुयोग्य जागा निश्चित करण्यात यावी.

(ड) नोटीस कालावधी समाप्त होताच, सदर वाहने हटवून त्यावर अधिनियमातील तरतूदीनुसार कारवाई करण्यात यावी. त्याबाबतची माहिती स्थानिक पोलीस प्रशासन व परिवहन विभागास देखील देण्यात यावी.

**०६.** सदर विशेष मोहिम महानगरपालिका कार्यक्षेत्रातील नागरीकांची सुरक्षितता, वाहतुक व्यवस्थापन, स्वच्छता व सौंदर्यीकरण यासाठी महत्वपुर्ण असल्याने, महानगरपालिका क्षेत्रात सदर योजनेची व्यापक प्रसिध्दी करण्यात यावी.

**०७.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००३०३१५४३३६३१२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shankar Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=65f3f4695111ee4b72455e21ef9099788d9b999ffbcaaa070711f14d2a10e138, serialNumber=c83ebbb277c2e72c85231b87f684c424a13c398a4f921b6d167a8c859e9817f5, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2020.03.05 16:09:31 +05'30'

**( शंकर त्र्यं. जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत: -**

१. मा. राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव(नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, परिवहन.
५. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
६. पोलीस आयुक्त (सर्व).
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी (सर्व).
९. आयुक्त, परिवहन.
१०.मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. प्रादेशिक उपायुक्त / उपायुक्त परिवहन (सर्व).
१३. सह / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती (नवि-२०).